५ सप्टेंबर शिक्षक दिनाच्या पार्श्वभूमीवर
Thank A Teacher अभियान आयोजित
करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शिदिअ- २०२०/ प्र.क्र. १२८/ एसडी- ६**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक ३१ ऑगस्ट, २०२०

## प्रस्तावना -

भारताचे राष्ट्रपती सर्वपल्ली राधाकृष्णन यांच्या जन्मदिनानिमित्त ५ सप्टेंबर "शिक्षक दिन" साजरा करण्यात येतो. महात्मा ज्योतिराव फुले, सावित्रीबाई फुले, रविंद्रनाथ टागोर, डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम यांनी शिक्षण क्षेत्रात केलेले योगदान अत्यंत मोलाचे आहे. प्रत्येक व्यक्तीच्या आयुष्याच्या जडणघडणीमध्ये शिक्षक हा अत्यंत महत्त्वाचा दुवा असतो. दरवर्षी शिक्षक दिनाच्या दिवशी ज्या शिक्षकांनी शिक्षणक्षेत्रामध्ये मोलाचे योगदान दिले आहे, त्यांचा माननीय राज्यपालांच्या हस्ते गौरव करण्यात येतो. Covid-१९ या रोगाच्या पार्श्वभूमीवर, या वर्षी शिक्षक दिन नेहमीप्रमाणे साजरा करता येणे शक्य नसले तरी, त्या व्यक्तीबद्दल ५ सप्टेंबर, २०२० ला प्रत्येक व्यक्ती, विद्यार्थी, पालक, शिक्षक, अधिकारी, सर्व क्षेत्रातील मान्यवर व समाजातील सर्वांनाच आपल्या जीवनात ज्या व्यक्तीला गुरू मानतो त्यांच्याप्रती आपले मनोगत व्यक्त करण्यासाठी **Thank A Teacher अभियान** ही मोहीम आयोजित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

समाजाच्या जडणघडणीमध्ये शिक्षकाचे कार्य अत्यंत महत्त्वाचे आहे. तसेच आपल्यापैकी प्रत्येकाच्या आयुष्यात असे शिक्षक येतात की ज्यांच्यामुळे आपल्या जीवनाला नवीन वळण मिळत जाते. आयुष्याच्या अश्या वळणावर या शिक्षकांनी आपणांवर विश्वास दाखवून, आपल्या कठीण परिस्थितीत मदत केलेली असते. आपल्याला आवश्यक असेल अशावेळी आपल्यातील आत्मविश्वास जागृत करून यश संपादनासाठी प्रोत्साहित केलेले असते. ज्या शिक्षकांनी आपल्या आयुष्यात परिवर्तन आणले अशा शिक्षकांचे "आभार" व्यक्त करण्यासाठी शासनाने एक अभियान राबविण्याचे ठरविले आहे. ह्या अभियानांतर्गत ५ सप्टेंबर या शिक्षक दिनानिमित्त आपल्या अश्या आवडत्या शिक्षकांबद्दल भावना व्यक्त करण्याची संधी सर्वांना देण्यात येत आहे.

२. Covid-१९ च्या प्रादुर्भावाच्या पार्श्वभूमीवर आता शिक्षक विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचत आहेत. त्यासाठी शिक्षकांची नवीन कौशल्य, नवीन शैक्षणिक साधने वापरण्याची इच्छा दिसून येते. केवळ शाळेमध्ये जाऊन शिकवणे, या पलीकडे जाऊन आता आधुनिक तंत्रज्ञानाच्या सहाय्याने शिक्षक मुलांना शिक्षण देत आहेत. ज्या ठिकाणी अशा आधुनिक सुविधा उपलब्ध होऊ शकत नाहीत, अशा ठिकाणी काही शिक्षक स्वतः पुढ़ाकार घेऊन मुलांच्या घरापर्यंत जाऊन त्यांना शिक्षण / ज्ञानदान देण्याचे महत्त्वपूर्ण कार्य करीत आहेत. असे हे शिक्षक निश्चितच अभिनंदनास पात्र आहेत. शिक्षकांच्या मार्गदर्शनामुळे आपल्या आयुष्यामध्ये जे अमुलाग्र बदल झाले, जी प्रगती झाली, ती शब्दरूपाने व्यक्त करण्यासाठी #Thank A Teacher ही मोहीम राबवण्यात येत आहे.

ही मोहीम, १) Facebook handle : Thxteacher,

२) Twitter :@thxteacher1,

३) Instagram : @thankuteacher1,

या सोशल मीडियाद्वारे राबविण्याचे ठरविण्यात आले आहे. यामध्ये समाजातील सर्व घटकांचा सहभाग आवश्यक आहे. यासाठी खालील उपक्रम सूचित करण्यात येत आहेत.

**५ सप्टेंबर २०२० रोजी प्रस्तावित कृति कार्यक्रम -**

**१. "शाळा बंद शिक्षण सुरु" उपक्रम यशोगाथा सादरीकरण-** कोविड-१९ च्या प्रादूर्भावादरम्यान या शैक्षणिक सत्रात शाळा बंद असल्या तरी विविध माध्यमातून, उपक्रमातून मुलांचे शिक्षण सुरु राहण्यासाठी शिक्षक प्रयत्न करीत आहेत. त्यांच्या या उपक्रमांच्या यशोगाथांचे सादरीकरण केंद्रस्तर,तालुका स्तर व जिल्हा स्तरा वरून करण्यात यावे.

**२. कोविड -१९ काळातील शिक्षणावर परिसंवाद-** शाळा बंद असल्या तरी वाडी वस्त्या, तांडे, दुर्गम व शहरी भागातील शिक्षकांसोबत काही स्वयंसेवक, शिक्षक मित्र शिक्षण देण्याचे काम स्वयंस्फूर्तीने करू करीत आहेत. अशा व्यक्तींचे वेबिनार तालुका, जिल्ह्यात आयोजित करण्यात यावेत.यामध्ये शाळाव्यवस्थापन समिती व पालकांना सहभागी करून घ्यावे.

**३. वक्तृत्व, निबंध, पोस्टर, घोषवाक्य, कविता, प्रेरणा व प्रबोधनात्मक गीतवाचन, नाट्यवाचन, अभिवाचन स्पर्धा-** शिक्षक दिनाच्या अनुषंगाने विद्यार्थ्यांसाठी व पालकांसाठी विविध

विषय देऊन online वक्तृत्व स्पर्धा, निबंध स्पर्धा, पोस्टर स्पर्धा ,घोषवाक्य स्पर्धा, शब्द देऊन कविता तयार करणे, प्रेरणा व प्रबोधनात्मक गीतवाचन, नाट्यवाचन, अभिवाचन स्पर्धांचे आयोजन करण्यात यावे.

**४. मी कोविडयोद्धा-** कोविड-१९ च्या प्रादूर्भावाच्या काळात शिक्षक, शिक्षण क्षेत्रातील अधिकाऱ्यांनी शिक्षण देण्याव्यतिरिक्त “कोविड योद्धा” म्हणून विविध कामे पार पाडली उदा. तपासणी करणे, बाहेरून आलेल्या नागरिकांचे सर्वेक्षण करणे, विलीगीकरण कक्षामध्ये निरीक्षक म्हणून व इतर या कामाचे अनुभव कथन करून त्यांचे कामाचे कौतुक करण्यात यावे

**५. शैक्षणिक रांगोळी, चित्रकला, सुशोभन स्पर्धा आयोजन करणे.**

**६. शिक्षणाच्या प्रयोगशील शाळांचे सादरीकरण करणे.**

**७. शिक्षक असलेले पण आता उच्च पदावरील व्यक्तींच्या मुलाखती घेणे / स्वत: व्हिडीओ तयार करून पाठविणे.**

उपरोक्त उपक्रमांचे आयोजन करीत असताना “माझे प्रेरक शिक्षक” या विषयाला प्राधान्य देण्यात यावे. याद्वारे समाजातील उत्तम काम करणाऱ्या शिक्षकांना प्रोत्साहन मिळेल. या उपक्रमातून विद्यार्थी, पालक व अधिकाऱ्यांना त्यांच्या शिक्षकांचे आभार मानण्याची ज्यांच्यामुळे ते आज विविध पदावर कार्यरत आहेत, त्या शिक्षकांचे आभार मानण्याची एक संधी आहे.

३. विधान सभा / विधान परिषद / लोकसभा / राज्यसभा सदस्यांनी आपापल्या मतदार संघात अशा कार्यक्रमांना प्रोत्साहन देण्यासाठी आपला सहभाग नोंदवावा व आपल्या मतदारसंघातील जिल्ह्यातील जे शिक्षक कौतुकास पात्र आहेत, त्यांचा या मोहिमेत भाग घेऊन सन्मान करावा. या मोहिमेमध्ये खाजगी शिक्षण संस्था व समाजातील प्रतिष्ठित नागरिकांनी आपला सहभाग नोंदवून आपल्या गुरूला त्याचे प्रती असलेल्या भावन व्यक्त करून शब्दरूपी गुरुदक्षिणा द्यावी. आपल्याला मिळालेले यश आपल्या शिक्षकांच्या मार्गदर्शनामुळे मिळाले हे आपल्या शब्दात व्यक्त करणे हीच आपली गुरुदक्षिणा ठरेल.

४. #Thank A Teacher या मोहिमेमध्ये शक्य असेल तेथे चित्रपट क्षेत्रामध्ये काम करणाऱ्या मान्यवर अभिनेत्यांचा अथवा अन्य क्षेत्रातील जसे कला, क्रीडा, सामाजिक, सांस्कृतिक, संशोधन, राजकीय, इ. क्षेत्रातील मान्यवरांचा सहभाग अवश्य घ्यावा.

५. सदरचे अभियान ५ सप्टेंबर “शिक्षक दिन” या दिवशी सुरू करावे व दिनांक ०५ सप्टेंबर, २०२० ते दिनांक १० सप्टेंबर, २०२० या कालावधीमध्ये विविध मान्यवरांच्या उपस्थितीमध्ये विविध कार्यक्रमांचे आयोजन करावे.

६. या मोहिमेचे एकत्रिकीकरण शालेय शिक्षण विभागाच्या संकेतस्थळावर Website - https://education.maharashtra.gov.in व https://ssampsp.org वर अपलोड करण्यासाठी mpspmah@gmail.com या ई-मेलवर पाठवावे. जिल्हा परिषद शाळा / अनुदानित / खाजगी विना अनुदानित शाळानिहाय अहवाल शिक्षणाधिकारी यांचे माध्यमातून एकत्रित करून शासनास सादर करावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००८३११८०००२१३२१ असा आहे. सदर निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2020.08.31 18:02:03 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. सभापती, विधान परिषद ,
३. मा. अध्यक्ष, विधान सभा,
४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
५. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
६. मा. मंत्री / राज्य मंत्री सर्व यांचे खाजगी सचिव,

७. महाराष्ट्रातील सर्व लोकसभा सदस्य / राज्यसभा सदस्य,
सर्व विधान सभा सदस्य,
सर्व विधान परिषद सदस्य,
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
९. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग,
१०. सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११. संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२. संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे,
१४. संचालक, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळ, पुणे,
१५. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, पुणे,
१६. संचालक, अल्पसंख्याक, महाराष्ट्र राज्य पुणे,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व शिक्षण उपसंचालक,
सर्व शिक्षणाधिकारी प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक
१७. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी / कर्मचारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग / निवड नस्ती एसडी-६